विशेषज्ञ संवर्गातील "क्ष-किरण तज्ज्ञ" या पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात पदोन्नतीने देण्यात आलेल्या पदस्थापनेमध्ये अंशत: बदल करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन आदेश क्रमांकः पदोन्न-११२१/प्र.क्र.२७/सेवा-२

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार संकुल इमारत १० वा मजला
मंत्रालय, मुंबई- ४०० ००१
दिनांक : ०८ऑक्टोंबर, २०२१

**संदर्भ** - १. सा. आ. वि., शासन आदेश क्र.पदोन्न-१११९/प्र.क्र.३२४/सेवा-२, दि.२८.०५.२०२०.
२.मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायधिकरण, मुंबई यांनी मूळ अर्ज क्र.२५६/२०२१ मध्ये दि.२०.०८.२०२१ रोजी दिलेले आदेश.

**शासन आदेश:-**

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ मधील डॉ. (श्रीमती) उर्मिला आर. कानवडे (मुंडे), वैद्यकीय अधिकारी, सामान्य रूग्णालय, औंध, पुणे यांना संदर्भाधीन शासन आदेश दि.२८.०५.२०२० अन्वये विशेषज्ञ संवर्गातील (वेतनस्तर एस-२३: ६७७००-२०८७००) क्ष-किरण तज्ज्ञ, सामान्य रूग्णालय, गडचिरोली या पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नतीने पदस्थापना देण्यात आली. यासंदर्भात डॉ. (श्रीमती) उर्मिला कानवडे (मुंडे) यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे मूळ अर्ज क्र.२५६/२०२१ दाखल केला. याप्रकरणी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायधिकरण, मुंबई यांनी दि.२०.०८.२०२१ रोजी दिलेल्या आदेशानुसार डॉ. (श्रीमती) उर्मिला आर. कानवडे (मुंडे) यांच्या पदोन्नतीनंतरच्या पदस्थापनेमध्ये खालील तक्यामधील स्तंभ क्र. (५) मध्ये दर्शविल्याप्रमाणे अंशत: बदल करण्यात येत आहे.

| अ. क्र. | वैद्यकीय अधिकाऱ्यांचे नाव व सध्याची पदस्थापना | मूळ प्रवर्ग | दि.२८.०५.२०२० च्या शासन आदेशान्वये पदोन्नतीनंतरची पदस्थापना | पदोन्नतीनंतरची सुधारीत पदस्थापना |
|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) |
| १. | डॉ. (श्रीमती) उर्मिला आर. कानवडे (मुंडे), वैद्यकीय अधिकारी, सामान्य रूग्णालय, औंध, पुणे. | खुला | क्ष-किरण तज्ज्ञ, सामान्य रूग्णालय, गडचिरोली. (रिक्त पदी) | क्ष-किरण तज्ज्ञ, सामान्य रूग्णालय, औंध, पुणे. (रिक्त पदी) |

२. पदोन्नतीबाबतच्या अन्य अटी व शर्ती संदर्भाधीन दि.२८.०५.२०२० च्या शासन आदेशात नमूद केल्याप्रमाणे राहतील.

३. संबंधित अधिकाऱ्यांना त्यांच्या पदोन्नतीनंतरच्या पदस्थापनेवर रुजू होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे. संबंधित अधिकाऱ्यांनी त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी एक महिन्याच्या आत हजर होऊन, त्याबाबतचा अहवाल उपसंचालक, आरोग्य सेवा, संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांना व शासनास सादर करावा. पदस्थापना बदलून घेण्यासाठी राजकीय दबाव आणल्यास सदर कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील तरतूदीनुसार शिस्तभंग विषयक कारवाईस पात्र ठरेल.

४. पदोन्नती दिलेल्या अधिकाऱ्यांनी त्यांना कार्यमुक्त केल्यानंतर नवीन पदस्थापनेवर विहित मुदतीत हजर व्हावे. जे अधिकारी विहित मुदतीत पदोन्तीवर हजर होणार नाहीत ते पदोन्नतीस इच्छुक नाहीत असे गृहीत धरुन त्यांची पदोन्नती रद्द करण्यात येईल. तसेच त्यांना देण्यात आलेला आश्वासीत प्रगती योजनेचा लाभ काढून घेण्यात येईल. तसेच, अधिकाऱ्यांनी पदोन्नती न स्विकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दि.१२.०९.२०१६ मधील तरतुदीनुसार कार्यवाही करण्यात येईल. या प्रकरणी संबंधीत उपसंचालक यानी संबंधीत अधिकाऱ्यांना कार्यमुक्त केल्यानंतर नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी वेळीच हजर होतात किंवा नाही याबाबतचा अनुपालन अहवाल विहित कालमर्यादेत शासनास सादर करावा.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०१११५३३२७१४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Chandrakant Haridas Wade

Digitally signed by Chandrakant Haridas Wade
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice & Special Assist Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7a8cb09a73bc92b24a171080ebd81893480c90bedd57685ea1ce3af533f64bce, serialNumber=9474e7143b2bc3fd96e8d7bf07d1ce51de8461d4c34ae1e3f643c11b54523936, cn=Chandrakant Haridas Wade
Date: 2021.10.11 17:04:51 +05'30'

( चंद्रकांत ह. वडे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२. संचालक, आरोग्य सेवा (१), मुंबई.
३. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (सर्व)
४. सह संचालक, आरोग्य सेवा (अ. व प्र.) मुंबई.

५. उपसंचालक, आरोग्य सेवा मंडळ, पुणे / नागपूर.

६. जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय, पुणे / गडचिरोली.

७. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखापरीक्षा), मुंबई/नागपूर

८. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर

९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/ गडचिरोली.

१०. मा. मंत्री (आरोग्य)/मा. राज्यमंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

११. सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन-१२ व १६-ब, मंत्रालय, मुंबई

१२. अपर मुख्य सचिव (सा.आ.) यांचे स्विय सहायक

१३. सर्व सह सचिव/उप सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई

१४. सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई

१५. संबंधित अधिकारी (संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांचे मार्फत)

१६. निवडनस्ती सेवा-२